# जाहीर निविदा सुचना
# विभागीय आयुक्त कार्यालय औरंगाबाद

जा.क्र.2010/साप्र/कक्ष-4/नपाप्र/सं/कावि- दि. 05 /04/2010

महाराष्ट्र जमीन महसुल अधिनियम 1966 चे कलम 79,122 व 126 महाराष्ट्र जमीन महसुल (गांव/शहर व नगर भुमापन) सुधारणा नियम 1969 च्या नियम 4 मध्ये दिनांक 6.10.2000 च्या अधिसुचने अन्वये दाखल करण्यात आलेल्या तरतुदी नुसार तसेच महाराष्ट्र शासन महसुल व वन विभागाकडील शासन निर्णय क्रमांक संकीर्ण -1006/प्र.क्र.301/ल-1 दिनांक 16 ऑगस्ट 2008 अन्वये औरंगाबाद विभागातील खालील दर्शविलेल्या नगर परिषदांच्या क्षेत्रातील महसुली गावांचे नगर भुमापन करविण्याचे ठरविले आहे.सदर कामासाठी भुकर सर्वेक्षणाचा अनुभव असलेल्या संस्थेकडुन 2 लिफाफा पध्दतीत मोहरबंद निविदा मागविण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| ब वर्ग नगर परिषदा | गंगाखेड(जि-परभणी),वसमत(जि-हिंगोली),देगलुर (जि-नांदेड),अंबाजोगाई,माजलगांव (जि-बीड),उदगीर (जि-लातुर) | एकुण- 06 |
| क वर्ग नगर परिषदा | कन्नड,गंगापुर,खुलताबाद (जि-औरंगाबाद),भोकरदन,परतुर (जि-जालना)<br>मानवत,सोनपेठ,पुर्णा,सेलु,जिंतुर,पाथरी (जि-परभणी) कळमनुरी (जि.हिंगोली)<br>बिलोली,उमरी,मुदखेड,कंधार,हदगांव,धर्माबाद,कुंडलवाडी,मुखेड,किनवट (जि.नांदेड) गेवराई,धारूर (जि.बीड)<br>उमरगा,भुम,परंडा,मुरूम,नळदुर्ग (जि-उस्मानाबाद) अहमदपुर,निलंगा (जि-लातुर) | एकुण-30 |

ब वर्ग नगर परिषदेसाठी इसारा रक्कम 30,000/- प्रत्येकी व कामाचा कालावधी एक वर्ष असेल तर क वर्ग नगर परिषदेसाठी इसारा रक्कम 20,000/- प्रत्येकी व कामाचा कालावधी 8 महिने राहील. सर्व नगर परिषदांसाठी निविदा किंमत प्रत्येकी 2000/- राहील.

वरील कामाकरिता कोरी निविदा फार्म विभागीय आयुक्त कार्यालय तथा प्रादेशिक संचालक,नगर पालिका प्रशासन कार्यालयातील नगर पालिका प्रशासन शाखा विभागीय आयुक्त कार्यालय,दिल्ली गेट जवळ, औरंगाबाद येथे दिनांक 5 एप्रील 2010 ते दिनांक 26 एप्रील 2010 दरम्यान कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी सकाळी 10.30 ते 14.00 या वेळेत पुढील कागदपत्रे सादर केल्यास रोख रक्कम भरून मिळतील.

अ. मागील तीन वर्षापैकी किमान एका वर्षात रू.30 लक्ष पेक्षा जास्त किंमतीचे अथवा कमीतकमी 25.00 चौरस किलोमीटर क्षेत्राचे शासनाकडील वा निमशासकीय संस्थेकडे सर्वेक्षणाचे काम केल्याचा दाखला- टीप:- सर्वे ऑफ ईंडिया मधील सेवानिवृत्त राजपत्रीत अधिकारी यांचे कडे Infrastructure असल्यास व सर्वेक्षणाचा किमान पांच वर्षाचा अनुभव असल्यास व तसे सर्वे ऑफ इंडियाचे प्रमाणपत्र सादर केल्यास 'अ'मधील अट शिथीलक्षम राहील.

ब. प्राप्तीकर विभागाकडील अलीकडचे ना थकबाकी प्रमाणपत्र.

क. बॅंकेकडील किमान रू.30 लक्ष एवढ्या रक्कमेचे पत प्रमाणपत्र-

ड. तांत्रिक कर्मचारी वर्गाची यादी व भुकर सर्वेक्षण अनुषंगिक अत्याधुनिक यंत्र सामग्रीचा तपशील.

उपरोक्त कागदपत्रांच्या तपासणी नंतर प्रथमदर्शनी पात्र आढळुन येणाऱ्या संस्थांना निविदेची किंमत (नापरतावा) भरल्यास कोरे निविदा अर्ज देण्यात येतील.निविदा कागदपत्र टपालाने पाठविल्या जाणार नाहीत.तसेच मंजुर निविदा धारकांना निविदेमध्ये नमुद केल्याप्रमाणे सुरक्षा अनामत रक्कम भरणे आवश्यक राहील.

उपरोक्त इसारा रक्कम केवळ राष्ट्रीयकृत बॅंकेचे डिमांड ड्रॉफ्ट ने विभागीय आयुक्त औरंगाबाद यांचे नावे निविदा सोबत भरण्यात यावी.मोहरबंद निविदा दिनांक 27 एप्रील 2010 रोजी दुपारी 14.00 वाजेपर्यंत निम्नस्वाक्षरीकार यांचे कार्यालयात स्विकारण्यात येतील.व प्राप्त निविदा त्याच दिवशी दिनांक 27 एप्रील 2010 रोजी दुपारी 16.00 वाजता उपस्थित निविदाकार समक्ष उघडण्यात येतील.

देकारपुर्व सभा दिनांक 20 एप्रील 2010 रोजी 16.00 वाजता विभागीय आयुक्त कार्यालय दिल्ली गेट जवळ औरंगाबाद येथे आयोजित केलेली आहे.ज्यांनी निविदा खरेदी केलेली आहे अशांच्या केवळ दोन प्रतिनिधीनाच या सभेत उपस्थित राहता येईल.देकारपुर्व सभा ही फक्त निविदेत समाविष्ट असलेल्या अटी व शर्तीच्या शंका निरसनासाठी / स्पष्टीकरणासाठी असेल आणि त्यामध्ये सुचित केलेल्या कोणत्याही सुधारणांची /बदलाची दखल घेतली जाणार नाही.

कोणतेही कारण न देता या सर्व निविदा नाकारण्याचे अथवा विविध संस्थांना काम भागश: वाटुन देण्याचे अधिकार विभागीय आयुक्त औरंगाबाद हे राखुन ठेवत आहे.

( सदर निविदा www.maharashtra.gov.in वर पहाण्यासाठी उपलब्ध आहे.)

दि. 5.04.2010

विभागीय आयुक्त औरंगाबाद

Mislines-10